सन २०१४-१५ मध्ये "ग्राम बिजोत्पादन" ही पंचवार्षीक योजना राज्यात राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक-१५१४/प्र.क्र.७५/१अे**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ९ मार्च, २०१५**

**वाचा** - १) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज -२०१४/ प्र.क्र. ११०/अर्थ-३, दि. ०१/०७/२०१४.
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, समक्रमांक, दि. ५ जुलै, २०१४.
३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, दि. ९ सप्टेंबर, २०१४.
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंदाज -२०१३/ प्र.क्र. ८५/अर्थ-३, दि. ०९/०२/२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यात १०० टक्के शुध्द तसेच प्रमाणित बियाणे उत्पादन, प्रक्रिया केंद्र व गोडाऊन उभारणे या कार्यक्रमासाठी ग्रामबिजोत्पादन या नवीन १०० टक्के राज्य पुरस्कृत पंचावार्षीक योजनेस सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता रु.५.९० लाख नियतव्यय पावसाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. त्यानुसार सन २०१४-१५ मध्ये ही योजना रु. ५.९० लाख खर्चासह राज्यात राबविण्यास संदर्भ क्र.२ येथील दि. ५ जुलै, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. १/०७/२०१४ नुसार सदर योजनेकरीता उपलब्ध रु. ५.९० लाख एवढ्या वार्षीक तरतूदीच्या ६० टक्के रकमेच्या मर्यादेत म्हणजेच रु. ३.५४ लाख रकमेस संदर्भ क्रमांक ३ अन्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दि. ९/०२/२०१५ नुसार सन २०१४-१५ करीता आवश्यक योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७५% मर्यादेत वितरणास प्रशासकीय विभागास मंजूरी देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. त्यानुसार सदर योजनेकरीता उपलब्ध रु. ५.९० लाख एवढ्या वार्षीक तरतूदीच्या ७५% टक्के रकमेच्या मर्यादेत म्हणजेच रु. ४.४२५ लाख रकमेपैकी अवितरीत रूपये ०.८८५ लाख रक्कम वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

या आदेशाद्वारे सन २०१४-१५ करीता ग्राम बिजोत्पादन या राज्य पुरस्कृत योजनेकरीता मंजूर करण्यात आलेली व वितरणासाठी उपलब्ध रू.५.९० लाख तरतूदीच्या ७५%

रक्कमेच्या मर्यादेत अवितरीत रूपये ०.८८५ लाख (अक्षरी रुपये अठ्याऐंशी हजार पाचशे फक्त)रक्कम वितरीत करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेसाठी होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थीक वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशीर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

" मागणी क्रमांक डी-३

२४०१ पीक संवर्धन

१०३ बी-बियाणे

(००) (२६) ग्राम बिजोत्पादन कार्यक्रम (राज्य योजना)

(२४०१ ९३७६) ३३ अर्थसहाय्य"

३. वरील निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यासही त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल तसेच विनियोजन प्रमाणपत्र विहीत मुदतीत राज्य शासनाला सादर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्रक्र.८५/अर्थ-३ दि. ९/०२/२०१५ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांन्वये तसेच मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११६३८२६७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajani Nath Renushe

Digitally signed by Rajani Nath Renushe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e62e5506683db09a0d08556a8167491a2bbdbbb6f74a23fc2aa9f8a1bfb8a74, cn=Rajani Nath Renushe
Date: 2015.03.11 16:48:19 +05'30'

**(र.ना.रेणुशे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३) संचालक, महाराष्ट्र राज्य बिज प्रमाणिकरण यंत्रणा, अकोला
४) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल -१/२, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

६) उप सचिव (निवगुनि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) उप सचिव (२अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उप सचिव (व्यय-१/अर्थसंकल्प-१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सर्व सह संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१२) सर्व उप विभागीय कृषि अधिकारी (जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांच्यामार्फत)
१३) सर्व तालुका बिजगुणन केंद्रे (जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांच्यामार्फत)
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) निवडनस्ती